**इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय (खुद्द) च्या कार्यालयीन वापराकरीता विद्युत फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशीन) भाड्याने घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-आस्थाप्र-२०२२/प्र.क्र.६२/आस्थापना-१,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २६ जुलै, २०२३

**वाचा:-** १) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक आस्थाप्र- २०१९/प्र.क्र. १०६/आस्था-१, दि.१८.०४.२०२२
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, समक्रमांक, दि.०५.०७.२०२२
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक आस्थाप्र-२०१९/प्र.क्र.०५/आस्थापना-१, दि.१५.१२.२०२२

**प्रस्तावना:-**

शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक शाकानि २०१७/प्र.क्र.३३/१८(र.व का.), दिनांक ०९.०३.२०१७ अन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे विभाजन करुन इतर मागास बहुजन कल्याण या विभागाची निर्मिती करण्यात आली आहे. सदर नवनिर्मित विभागाच्या कार्यालयीन वापराकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेली जागा अपूरी असल्याने, विभागाचे कामकाज करण्यास उद्भवणाऱ्या अडचणी विचारात घेवून, मंत्रालय परिसरातील मोतीमहल इमारतीतील रुम नं.५, दुसरा मजला, १९५ जे. टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई येथील २००० चौ.फुट इतकी जागा भाड्याने घेण्यास संदर्भाधिन दि.१८.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर जागेत स्थलांतरीत झालेल्या विभागातील कार्यासनांच्या नस्त्या/कागदपत्रांची आवश्यकतेनुसार झेरॉक्स करण्यासाठी स्वतंत्र विद्युत फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशीन) भाडेतत्वावर घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इतर मागास बहुजन कल्याण विभाग (खुद्द) च्या कार्यालयीन वापराकरीता मंत्रालय इमारतीत सामान्य प्रशासन विभागाने उपलब्ध करुन दिलेली जागा अपूरी पडत असल्याने मंत्रालय परिसरातील मोतीमहल इमारतीतील रुम नं.५, दुसरा मजला, १९५ जे. टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई येथील २००० चौ.फुट इतकी जागा भाड्याने घेण्यास संदर्भाधिन क्र.१ येथील दि.१८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. मोतीमहल इमारतीत उक्त प्रमाणे भाड्याने घेण्यात आलेल्या जागेमध्ये विभागाच्या कार्यालयीन कामासाठी संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०५.०७.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रतिपृष्ठ रु.०.२० पैसे अधिक जीएसटी या दराने एक विद्युत फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशीन) माऊली इंटरप्रायजेस,पवई, मुंबई या संस्थेकडून एक वर्षाच्या कालावधीकरिता भाडेतत्वावर घेण्यात आले होते. सदर झेरॉक्स मशिनच्या भाडेकराराची मुदत दि.०४.०७.२०२३ रोजी संपुष्टात आलेली असून, भाडेकराराची मुदत वाढविण्याच्या अनुषंगाने माऊली

इंटरप्रायजेस, पवई, मुंबई या संस्थेकडे विचारणा केली असता, सदर संस्थेने पुर्वीच्या दराने (रु.०.२० पैसे + GST) फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशीन) भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यास नकार दिलेला आहे.

३. यापुर्वी या विभागाच्या संदर्भाधिन क्र.३ येथील दि.१५.१२.२०२२ च्या आदेशान्वये विहित प्रक्रीया राबवून गायत्री ट्रेडिंग, लोअर परेल, मुंबई या संस्थेकडून प्रतिपृष्ठ रु.०.१८ पैसे अधिक जी.एस.टी. या दराने दोन फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशिन) भाडेकरारावर मंत्रालय व नवीन प्रशासन भवन येथील विभागाच्या कार्यालयात बसवून घेण्यात आल्या आहेत. त्याच दराने मोतीमहल इमारतीतील विभागाच्या कार्यालयात एक फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशिन) भाडेकरारावर बसविण्याबाबत गायत्री ट्रेडिंग या संस्थेस विचारणा केली असता, सदर संस्थेने प्रतिपृष्ठ रु.०.१८ पैसे अधिक जी.एस.टी. या दराने एक फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशीन) भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यास सहमती दर्शविली आहे.

४. त्यानुसार गायत्री ट्रेडिंग, लोअर परेल, मुंबई या संस्थेकडून रु.०.१८ पैसे अधिक जी.एस.टी. या दराने आदेशाच्या दिनांकापासून दि.०१.०१.२०२४ या कालावधीकरिता एक विद्युत फोटोकॉपी यंत्र (झेरॉक्स मशिन) भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर संस्थेमार्फत भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या फोटोकॉपी यंत्राकरिता आवश्यक असणारे टोनर व दुरुस्ती (सुटे भागांसहित) या बाबी तात्काळ उपलब्ध करुन देणे व सदर मशीन सुस्थितीत कार्यरत ठेवणे, संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

६. सदर मशीनसाठी लागणारे कागद (पेपर) व वीज विभागामार्फत पुरविण्यात येईल.

७. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडजी-२, २२५१-सचिवालय सामाजिक सेवा, ०९०-सचिवालय, (००) (०२) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग (२२५११३२५), १३ - कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-दोन मधील अनुक्रमांक २६-ब, नियम क्रमांक ७६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०७१४४२४९२१३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.08.07 15:23:48 +05'30'

**( कैलास ता.साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई

३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. लेखा अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मे.गायत्री ट्रेडींग, शॉप नं.१, फोनिक्स मॉल, एस.बी.मार्ग, लोअर परेल, मुंबई-४०००१३.
८. निवडनस्ती (आस्थापना-१)